**महाराष्ट्र शासन**

ज्ञापन क्रमांक- ठेवियो १०.१४/(२३७/२०१४)/अर्थ-१

जलसंपदा विभाग,
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय मुंबई ४०००३२
दिनांक-१३/११/२०१४

**ज्ञापन:-**

विषय :- **दिवंगत कर्मचाऱ्यांच्या वारसांना ठेव संलग्न विमा योजनेअंतर्गत अनुज्ञेय असलेली रक्कम अदा करणेबाबत.**

**संदर्भ :** १. शासन परिपत्रक क्र. ठेवियो १०.०८/(२४९/२००८)/अर्थ-१, दि.२६/०५/२००८.
२. शासन परिपत्रक क्र. ठेवियो १०.०८/(३८५/२००८)/अर्थ-१, दि.०५/०१/२०१३.

१. अधिक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली.
२. अधिक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ,सातारा.
३. अधिक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक.
४. अधिक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर.
५. अधिक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ.

उपरोक्त नियंत्रक अधिका-यांना कळविण्यात येते की,ठेव संलग्न विमा योजनेसंदर्भात विभागाने अवलंबिलेली सुधारित कार्यपद्धत संदर्भाधीन परिपत्रकान्वये निश्चित करण्यात आली आहे. या सुधारित कार्यपध्दतीच्या अनुषंगाने प्रस्तावाची पडताळणी करण्यात आली आहे.

२. सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षासाठी मागणी क्रमांक आय-२ प्रधानशीर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०४-ठेव संलग्न विमा योजना शासकीय भविष्य निर्वाह निधी (०१) (०१) ठेव संलग्न विमा योजनेनुसार प्रदाने (योजनेतर) (२२३५-०६०५) या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानाच्या तरतूदीतून सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील स्तंभ-५ येथील मृत कर्मचाऱ्यांच्या वारसांना स्तंभ-६ प्रमाणे रक्कम प्रदान करण्यास शासनाच्या मान्यतेने निधी उपलब्धता प्रमाणपत्र देण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारीनिहाय **एकूण रु. ७,८०,०००/- (रुपये सात लाख ऐंशी हजार फक्त)** इतका निधी या ज्ञापनाद्वारे वितरीत करण्यात येत आहे.

३. या निधी उपलब्धता प्रमाणपत्रानुसार संबंधित कर्मचाऱ्यांच्या वारसांना वरील रक्कम अदा करण्याकरीता मंजुरीचे आदेश त्वरीत काढावेत. सदर आदेशाची प्रत शासनास व महालेखापालांच्या कार्यालयास पाठवावी. नियंत्रक अधिका-यांनी वितरीत केलेला निधी तात्काळ आहरित करण्याची कार्यवाही करावी.

४. देयक मंजुरीनंतर देयकाची रक्कम, तसेच संबंधिताना रक्कम अदा केल्याचा दिनांक इत्यादीचा तपशील शासनास त्वरीत कळवावा. आपणास अशीही विनंती करण्यात येते की, खाली नमुद केलेल्या लेखाशीर्षाखालील खर्च-मेळाचे निष्पत्ती दर्शविणारे प्रमाणपत्र (रिकन्सिलिअेशन स्टेटमेंट) महालेखापालाच्या कार्यालयातून घेऊन शासनास पाठवावे.

५. यावर होणारा खर्च मागणी क्रमांक-आय-२ खालील २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०४- ठेव संलग्न विमा योजना शासकीय भविष्य निर्वाह निधी (०१)(०१) ठेव संलग्न विमा योजनेनुसार प्रदाने (योजनेतर) (२२३५-०६०५) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्याखाली संगणकीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत केलेल्या तरतूदीतून भागवावा.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात येत असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१४१११३१५१३०७६५२७ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Avinash Hatwalne

Digitally signed by Sunil Avinash Hatwalne
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sunil Avinash Hatwalne
Date: 2014.11.13 15:26:54 +05'30'

**( सु. अ.हातवळणे )**

**कार्यासन अधिकारी**

**सहपत्र** : वरीलप्रमाणे.

**प्रत** :- महालेखापाल कार्यालय,मुंबई/नागपूर

अर्थ-१ कार्यासन संग्रहार्थ.

**शासन पत्र क्रमांक ठेवियो १०.१४/(२३७/२०१४) /अर्थ-१, दिनांक १३ /११/२०१४ चे सहपत्र**

सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षामध्ये ठेव संलग्न विमा योजनेतर्गत अनुज्ञेय निधी उपलब्धतेचा तपशील.

| अ. क्र. | बीडीएस | मंडळ कार्यालयाचे नाव | भविष्य निर्वाह निधी | ठेव संलग्न विमा योजना धारकाचे | रुपये |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | १००११ | अधिक्षक अभियंता, सांगली पाटबंधारे मंडळ, सांगली. | एसआयडी/एसएलआय-५२२ | जालींदर रंगराव खाडे, कालवा चौकिदार | ६००००.०० |
| | | | टेंउसिंप्रविक्र-२/६९ | पांडुरंग विठोबा बागडे,चौकिदार | ६००००.०० |
| | | | पीडब्ल्यु/एमएच-५१०५० | बळवंत गणपत नायकवडे, शाखा अभियंता | ६००००.०० |
| | | | | **एकूण** | **१८००००.००** |
| २ | १००१९ | अधिक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ,सातारा. | पीडब्ल्यु/एमएच-६२८४२ | नंदकुमार ज्ञानोबा बाचल, कनिष्ठ लिपीक | ६००००.०० |
| | | | | **एकूण** | **६००००.०** |
| ३ | १००३२ | अधिक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक. | नापावि-१३११ | गजानन नारायण कापसे, मजूर | ६००००.०० |
| | | | पीडब्ल्यु/एमएच-७०४८७ | अशोक जिभाऊ काकळीज, वायरमन | ६००००.०० |
| | | | बीआरबीएन-५१२५६ | सुर्यभान पी. पौनीकर, टंकलेखक | ६००००.०० |
| | | | पीडब्ल्यु/एमएच-७४५९७ | आण्णासाहेब भागवत वाक्चौरे, दप्तर कारकून | ६००००.०० |
| | | | | **एकूण** | **२४००००.००** |
| ४ | १००४३ | अधिक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर. | बीआरबीएन-४९८२७ | उल्हास नारायण बक्षी, कारकून | ६००००.०० |
| | | | बीआरबीएन-१७८७८ | दिनदयाल तुकाराम मेश्राम, मोजणीदार | ६००००.०० |
| | | | प्रअभु व जव्यपप्रना क्र.९१३ | अखाडू श्रीपत येलेकर, मजूर | ६००००.०० |
| | | | प्रअभु व जव्यपप्रना क्र.८८७ | मोरेश्वर विठोबा खानोरकर, मजूर | ६००००.०० |
| | | | | **एकूण** | **२४००००.००** |
| ५ | १००४५ | अधिक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे मंडळ, यवतमाळ. | काअ/अप्रवि-२२२ | लक्ष्मण किसन घोरपडे, मजूर | ६००००.०० |
| | | | | **एकूण** | **६००००.००** |
| | | | | **एकुण सर्व** | **७८००००.००** |